**<u>नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने, दि.१ जुलै, २०१४ रोजी पारित केलेला ठराव क्र.६३० व ठराव क्रं. ६३१ निलंबित करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक. नमुंम-१२१५/प्र.क्र.३१/१५/नवि-२८**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ३ जुलै, २०१५.

**<u>संदर्भः</u>-** १) नवी मुंबई महानगरपालिका परिवहन समिती ठराव क्र.२५, दि.३० सप्टेंबर,२०१३.

२) नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभेचा विषय क्रं. ४,ठराव क्र.३७९, दि.१८ ऑक्टोबर,२०१३.

३) नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभेचा ठराव क्र.६३०, दि. १ जुलै, २०१४.

४) नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभेचा ठराव क्रं. ६३१, दि. १ जुलै, २०१४.

५) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे दिनांक १५ एप्रिल, २०१५ चे पत्र.

**<u>प्रस्तावनाः-</u>**

नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या बस चालनासंदर्भातील बाबींच्या (उदा. डिझेल, सीएनजी, वंगण, बसेसचे सुट्टे भाग, टायर, ट्यूब इ.) किंमतीमध्ये झालेली भरमसाट वाढ, कर्मचा-यांचे वेतन व भत्ते, शासकीय कर, प्रशासकीय कामकाजास लागणारे साहित्य, स्थापत्यविषयक डागडुजी खर्चात झालेली वाढ, टोल नाक्यावर भरावा लागणारा पथकर इत्यादी कारणांमुळे नवी मुंबई महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमास मासिक रु.२.५० कोटी ते रु. ३.३० कोटी तोटा सहन करावा लागत आहे. त्यामुळे परिवहन समितीच्या संदर्भ क्रं. १ येथील ठरावान्वये, नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या वातानुकूलित आणि सर्वसाधारण बससेवेच्या तिकीट दरामध्ये सुधारित दराची अंमलबजावणी, प्रादेशिक परिवहन प्राधिकरण त्यास ज्या दिनांकास मंजुरी देईल, त्यानंतरच्या दिनांकापासून करण्यास मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव महासभेस सादर केला. महानगरपालिका महासभेच्या दिनांक १८ ऑक्टोबर, २०१३ रोजीच्या सर्वसाधारण सभेत नवी मुंबई महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमाच्या वातानुकुलीत आणि सर्वसाधारण बससेवेच्या सुधारित तिकिट दरास मंजुरी देण्याबाबत ठराव क्र. ३७९ पारित करण्यात आला. तद्नंतर मुंबई महानगर प्रादेशिक परिवहन प्राधिकरणाच्या दिनांक ०१ मार्च, २०१४ रोजीच्या सभेत नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाने सादर केलेल्या बस तिकीट दरवाढीच्या प्रस्तावास प्राधिकरणाने मान्यता दिली व दिनांक ०१ मार्च, २०१४ पासून नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या सुधारित तिकीट दरवाढीची अंमलबजावणी करण्याबाबत निर्देशितही केले. तथापि, या कालावधीत लोकसभा सार्वत्रिक निवडणुकीची आचारसंहिता असल्याने सदरील सुधारित तिकीट दरवाढीची अंमलबजावणी करता आली नाही.

दरम्यान नवी मुंबई महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रमाच्या वातानुकुलित आणि सर्वसाधारण बससेवेच्या सुधारित तिकीट दराबाबतचा महासभेच्या विषय क्र. ४, ठराव क्र. ३७९, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१३ अन्वये मंजूर झालेल्या ठरावात सभागृहाच्या कामकाजविषयक नियमावलीतील नियम १ (र) अन्वये फेरबदल किंवा रद्द करण्यात यावा, अशा आशयाचा ठराव नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. ६३०, दिनांक १ जुलै, २०१४ अन्वये पारित

करण्यात आला. तसेच नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमाच्या वातानुकुलित आणि सर्वसाधारण बस सेवेच्या सुधारित तिकीट दरवाढीचा मंजूर झालेला प्रशासनाचा मुळ प्रस्ताव देखील सर्वसाधारण सभा,ठराव क्र. ६३१, दिनांक १ जुलै, २०१४ अन्वये नामंजूर करण्यात आला.

आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी संदर्भ क्रं. ५ अन्वये शासनास सादर केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, नवी मुंबई परिवहन उपक्रमास होत असलेला आर्थिक तोटा काही अंशी कमी करण्याच्या दृष्टीने प्रादेशिक परिवहन प्राधिकरण, मुंबई महानगर क्षेत्र यांनी मंजूर केलेल्या सुधारित तिकीट दरवाढीची तात्काळ अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. यास्तव, दिनांक ०१ जुलै, २०१४ रोजीच्या सर्वसाधारण सभेतील ठराव क्र. ६३० व ठराव क्र. ६३१ निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

वरील प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भ क्र. ५ येथील पत्राद्वारे प्रस्तावित केल्यानुसार, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ मधील तरतुदीनुसार शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करुन नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दिनांक ०१ जुलै, २०१४ रोजी पारित केलेले ठराव क्र. ६३० व ठराव क्र. ६३१ विखंडीत करण्याच्या अनुषंगाने निलंबित करण्यात येत आहेत.

उपरोक्त अनुषंगाने नवी मुंबई महानगरपालिकेच्या परिवहन समितीचा ठराव क्र. २५, दिनांक ३० सप्टेंबर, २०१३ व सर्वसाधारण सभेचा ठराव क्र. ३७९, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१३ या ठरावांनुसार सुधारित दराची अंमलबजावणी तात्काळ सुरु करण्याबाबत आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी आवश्यक कार्यवाही करावी. याबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०३१४४५२८९९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.07.03 14:49:03 +05'30'

(ज. ना. पाटील)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
४) सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५) निवडनस्ती (नवि-२८)